केंद्र शासनाकडून राज्यास भांडवली खर्चासाठी कर्ज स्वरुपात विशेष सहाय्य योजना (बिनव्याजी कर्ज) अंतर्गत भाग-१ व भाग-५ मधील योजनांना सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीमार्फत (PFMS) कार्यान्वय करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग,**

**शासन निर्णय क्र. विसयो-०४२३/प्र.क्र ११५/पोल-७**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय मुंबई-४०००३२

दिनांक : १ ऑगस्ट, २०२३.

संदर्भ :-१., वित्त विभाग, शासन पत्र क्र. संकीर्ण -२०२३/प्र.क्र.०९/अर्थबळ, दि.१२.०४.२०२३.

२. Letter of Government of India, Ministry of Finance, F. No. ४४(१)/PF-S/ २०२३-२४(CAPEX) दि.०२/०५/२०२३.

३. समक्रमांकाचा शासन निर्णय दिनांक २ मे, २०२३.

**प्रस्तावना :-**

वित्त विभाग, शासन पत्र, दि. १२.०४.२०२३ अन्वये, केंद्रीय पुरस्कृत योजनांच्या निधीचे परिणामकारक व्यवस्थापन करण्याच्या तसेच निधी विनियोजनाच्या प्रक्रियेत अधिक परिणामकारकता आणण्याच्या दृष्टीने भारत सरकारच्या दिनांक ०२/०५/२०२३ च्या मार्गदर्शक तत्वांनुसार निर्धारित केलेल्या सुधारित कार्यपद्धतीचा अवलंब करण्याचे निर्देश देण्यात आले आहेत. सदर सुधारित कार्यपद्धतीनुसार प्रत्येक केंद्र पुरस्कृत योजनेच्या अंमलबजावणीसाठी संबंधित प्रशासकीय विभागाने Single Nodal Agency (SNA) नेमणूक करुन, त्या योजनेसाठी प्राधिकृत बँकेत स्वतंत्र Bank Account उघडावे. तसेच योजनेच्या समन्वयाच्या दृष्टीने किमान उपसचिव दर्जाच्या अधिकाऱ्याची Nodal Officer म्हणून नियुक्ती करण्याच्या सूचना वित्त विभागाने दिल्या आहेत. त्यानुसार केंद्र शासनाच्या अर्थसहाय्यातून गृह विभागामार्फत राज्यात राबविण्यात येणाऱ्या राज्यास भांडवली खर्चासाठी कर्ज (बिनव्याजी कर्ज) स्वरूपात विशेष सहाय्य ही योजना सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीवर (PFMS) मॅपिंग करुन, सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी राज्यस्तरावर नोडल अधिकारी Single Nodal Agency (SNA) ची नेमणूक करणे तसेच Single Nodal Agency (SNA) चे प्राधिकृत बँकेमध्ये स्वतंत्र खाते Single Nodal Bank Account (Parent Account) उघडणे आणि अंमलबजावणी यंत्रणांसाठी Child Account उघडण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त विषयांकित प्रकरणी, संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णय अधिक्रमीत करण्यात येत आहे. तसेच या संदर्भात खालीलप्रमाणे सुधारीत निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

२. सदर कर्ज योजनेसाठी दिनांक २ मे, २०२३ च्या शासन निर्णयानुसार नोडल एजन्सी म्हणून महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळास नियुक्त केले आहे. तथापि, केंद्र शासनाच्या सुधारीत कार्यपध्दती / मार्गदर्शक तत्वानुसार महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ हे अंमलबजावणी यंत्रणा असल्याने, सदर योजनांचे अंमलबजावणीसाठी केंद्र शासन व अंमलबजावणी यंत्रणा या दरम्यान व्यवस्थापन करण्यासाठी राज्यस्तरावर / प्रशासकीय विभाग स्तरावर State Scheme Manager (SSM) आणि Single Nodal Agency (SNA) म्हणून गृह विभाग (पोल-७) यांची नियुक्ती करण्यात येत आहे.

३. वित्त विभाग, शासन पत्र, दि. १२.०४.२०२३ अन्वये, केंद्रीय पुरस्कृत योजनांच्या निधीचे परिणामकारक व्यवस्थापन करण्याच्या तसेच निधी विनियोजनाच्या प्रक्रियेत अधिक परिणामकारकता आणण्याच्या दृष्टीने भारत सरकारच्या दिनांक ०२/०५/२०२३ च्या मार्गदर्शक सुचनान्वये निर्धारित केलेल्या सुधारित कार्यपद्धतीचा अवलंब करण्याचे निर्देश देण्यात आले आहेत. सदर सुधारित कार्यपद्धतीनुसार प्रत्येक केंद्र पुरस्कृत योजनेच्या अंमलबजावणीसाठी संबंधित प्रशासकीय विभागाने Single Nodal Agency (SNA) नेमणूक करुन, त्या योजनेसाठी प्राधिकृत बँकेत स्वतंत्र Bank Account उघडावे तसेच योजनेच्या समन्वयाच्या दृष्टीने किमान उपसचिव दर्जाच्या अधिकाऱ्याची Nodal Officer म्हणून नियुक्ती करण्याच्या सूचना वित्त विभागाने दिल्या आहेत. त्यानुसार केंद्र शासनाच्या अर्थसहाय्यातून गृह विभागामार्फत राज्यात राबविण्यात येणाऱ्या राज्यास भांडवली खर्चासाठी कर्ज (बिनव्याजी कर्ज) स्वरूपात विशेष सहाय्य ही योजना सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीवर (PFMS) मॅपिंग करुन, सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी राज्यस्तरावर नोडल अधिकारी Single Nodal Agency (SNA) ची नेमणूक करणे तसेच Single Nodal Agency (SNA) चे प्राधिकृत बँकेमध्ये स्वतंत्र Single Nodal Bank Account (Parent Account) उघडणे आणि अंमलबजावणी यंत्रणासाठी Child Account उघडण्याची आवश्यकता आहे.

४. याबाबत बँक ऑफ महाराष्ट्र यांच्याकडून प्रस्ताव प्राप्त झाला आहे. बँक ऑफ महाराष्ट्र यांनी प्रस्तावामध्ये या योजनेशी संबंधित सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली (PFMS) शी निगडीत प्रशिक्षण, खाती उघडण्यास मदत, मॅपिंग व निधी केंद्र-राज्य-अंमलबजावणी यंत्रणेस हस्तांतरणासाठी प्रक्रिया सुलभपणे हाताळण्यास पूर्ण तांत्रिक सहकार्य विशेष अधिका-यांमार्फत वेळोवेळी करण्यासाठी आश्वस्त केले आहे. त्यामुळे गृह विभागाचे स्वतंत्र Single Nodal Bank Account (Parent Account) उघडणे आणि अंमलबजावणी यंत्रणासाठी Child Account बँक ऑफ महाराष्ट्र, मंत्रालय शाखा, मुंबई मध्ये त्यांच्या प्रस्तावाच्या अनुषंगाने उघडण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

५. केंद्र शासनाच्या Scheme for Special Assistance as Loan to State for Capital Investment या केंद्र सरकारच्या योजने अंतर्गत २०२३-२४ या वर्षासाठी राज्य शासनाला भाग-१ (Untied) आणि भाग-५ (Housing for Police personal above or as part of Police Station in urban areas) या योजनांतर्गत विशिष्ट कामांना निधी उपलब्ध करून देण्यात येणार आहेत. सदर निधीचे, निधी वितरण व विनियोग व्यवस्थापन केंद्रीय सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली (PFMS) मार्फत करण्याच्या सूचना वित्त विभागाने दिल्या आहेत. त्यानुसार सदर योजनांच्या अंमलबजावणीसाठी स्वतंत्र लेखाशिर्ष उघडणे, तसेच सदर योजना PFMS शी मॅपिंग करून प्राधिकृत बँकेमध्ये स्वतंत्र Single Nodal Bank Account (Parent Account) आणि अंमलबजावणी यंत्रणासाठी Child Account उघडण्याच्या अनुषंगाने निर्णय घेणे योग्य होईल. तसेच महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळास सदर योजनेसाठी नोडल एजन्सी म्हणून नेमणूक करण्यात आली होती, ती अधिक्रमीत करुन सुधारीत मार्गदर्शक तत्वाच्या अनुषंगाने पुढीलप्रमाणे अटी व शर्तीच्या आधारे निर्णय घेण्यात येत आहे.

१) सदर योजनांचे सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीमार्फत (PFMS) मॅपिंग करून घेण्याबाबतची कार्यवाही राज्य प्रकल्प व्यवस्थापन कक्ष, मुंबई यांच्याकडून करण्यात येईल.

२) सदर योजनांचे अंमलबजावणीसाठी प्रशासकीय विभाग स्तरावर State Scheme Manager (SSM) म्हणून श्री. कैलास गायकवाड, सह सचिव (गृह विभाग- पोल ७) यांची निवड करण्यात येत आहे. ते सदर योजनेचे SNA म्हणून काम पाहतील. तसेच First Level Agency (Parent Agency) म्हणून काम पाहतील.

३) सदर योजनांचे अंमलबजावणीसाठी State Scheme Manager (SSM) स्तरावर स्वतंत्र SNA Bank Account व अंमलबजावणी यंत्रणास्तरावर (महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ) यांचे Child Account बँक ऑफ महाराष्ट्र, मंत्रालय शाखा, मुंबई या बँकेत उघडण्यास सदर शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

४) सदर SNA खाते व शुन्य शिल्लक उपखाती हे PFMS प्रणालीशी संलग्नित करावे.

५) सदर खात्याचा वापर केवळ उक्त योजनांच्या प्रयोजनासाठीच करावा.

६) केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचना पत्र क्र F. No. ४४(१)/PF-S/२०२३-२४(CAPEX) दि.०२-०५-२०२३ नुसार सदर योजनेचा निधी केंद्रिय पध्द्तीने संबंधित State Scheme Manager (SSM) स्तरावरील SNA (Parent Account) मध्ये जमा करुन अंमलबजावणी यंत्रणेला (Implementing Agency) Child Account मध्ये आवश्यक निधी वर्ग न करिता सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली (PFMS) मार्फत Drawing limits देण्यात याव्यात.

७) सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी आवश्यक ते प्रशिक्षण व तांत्रिक सहकार्य बँक ऑफ महाराष्ट्र या बँकेमार्फत उपलब्ध करुन देण्यात येईल.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेताक २०२३०८०२१३२७४३७१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NARAYAN
BIRA MANE

Digitally signed by NARAYAN BIRA MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ï¿¿HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1dfb457576797050f19aafaa495673fc843c789942459cd39fc5561071b4a70c, pseudonym=D53E4970DA18F4240576F3F34F92F7E069E6A52A, serialNumber=79C09BA352C5B3E65B259113F1CDCFAB29FB961D4EA9A24411D7F622D2ED20BF, cn=NARAYAN BIRA MANE
Date: 2023.08.04 11:59:48 +05'30'

**( नारायण बि. माने )**
**कार्यासन अधिकारी, गृह विभाग.**

**प्रत :-**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन मुंबई
२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.उपमुख्यमंत्री (गृह), महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
५. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. प्रधान सचिव (बांधकाम), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
९. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्यादित, मुंबई.
१०. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, मुंबई
११. महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), मुंबई.
१२. महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), नागपूर
१३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१५. कार्यासन अधिकारी (व्यय-७/अर्थ-११/अर्थबळ) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६. कक्ष अधिकारी (अर्थ-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
१७. निवडनस्ती, पोल-७.